महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील
<u>अधिका-यांच्या बदल्या / नियुक्त्या.</u>

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन आदेश, क्रमांक : मविसे १० / २००९ /प्र.क्र.१६२ / आस्था-३**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२**
**दिनांकः- १८ जुलै, २००९**

<u>**आदेश**</u>**:-** सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पांडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील कलम ४(४) च्या परंतुक (एक) मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-यांच्या मान्यतेने ग्राम विकास व जलसंधारण विभागातील **श्री.अनुप सा. शेंगुलवार , राज्य मुल्यांकन व संनियंत्रण तज्ञ, जलस्वराज्य प्रकल्प, कोकण भवन, नवी मुंबई** यांच्या सेवा परत घेऊन त्यांची नियुक्ती **उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रापं) जिल्हा परिषद, जालना** या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. **श्री. शेंगुलवार** यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२ / २५६७ / २८ / अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिका-याला त्यांच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. **श्री.शेंगुलवार** यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

५. **श्री.शेंगुलवार** यांची बदली ही त्यांच्या विनंतीवरुन करण्यात येत असल्याने, त्यांना पदग्रहण अवधी व प्रवासभत्ता अनुज्ञेय असणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कैलास शिंदे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति

प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई
विभागीय आयुक्त , कोकण विभाग व औरंगाबाद विभाग
सहसचिव व संचालक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई
मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद,जालना
महालेखापाल- १/२ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर
श्री.अनुप सा. शेंगुलवार , राज्य मुल्यांकन व संनियंत्रण तज्ञ, जलस्वराज्य प्रकल्प, कोकण भवन,नवी मुंबई
मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक.
कार्यासन क्रमांक : आस्था - २ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
निवड नस्ती ( कार्यासन क्रमांक :आस्था-३ ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग.